राज्याच्या कृषि वृध्दीदर वाढीच्या मुल्यमापनासाठी राज्यस्तरीय शिखर समिती तसेच उपसमिती गठीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.६८/११-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३१ मे, २०१७

**प्रस्तावना :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नियोजन विभाग, मुंबई, महाराष्ट्र राज्य यांनी प्रकाशित केलेल्या सन २०१६-१७ या कालावधीच्या महाराष्ट्राची आर्थिक पाहणी अहवालाप्रमाणे मागील दोन वर्षाच्या कालावधीत झालेल्या अपुऱ्या पावसाच्या पार्श्वभूमीवर दुसऱ्या सुधारित अंदाजानुसार राज्यात सन २०१४-१५ मध्ये (-) १७.५ टक्के तर सन २०१५-१६ मध्ये (-) १०.३ टक्के कृषि वृध्दीदर राहिलेला आहे. सन २०१६-१७ मध्ये समाधानकारक पाऊस झाल्यामुळे कृषि क्षेत्राचा वास्तविक स्थुल राज्य वृध्दीदर १९.३ टक्के राहणे अपेक्षित आहे. या अनुषंगाने सन २०१६-१७ या वर्षात साध्य कृषि वृध्दीदराचे मुल्यमापन करुन वृध्दीदराबाबतची कारणमिमांसा, वृध्दीदरात अडथळा ठरणाऱ्या बाबी व वृध्दीदरात सातत्याने वाढ करण्यासाठी करावयाची उपाययोजना सुचविण्यासाठी राज्यातील चार कृषि विद्यापीठांतर्गत विस्तार शिक्षण संचालकांच्या अध्यक्षतेखाली विद्यापीठनिहाय उपसमिती आणि राज्यस्तरावर कुलगुरुंच्या अध्यक्षतेखाली शिखर समिती नेमून संकलित मूल्यमापन अहवाल तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ या वर्षात साध्य कृषि वृध्दीदराचे मुल्यमापन करुन वृध्दी बाबतची कारणमिमांसा, वृध्दीदरात अडथळा ठरणाऱ्या बाबी व वृध्दीदरात सातत्याने वाढ करण्यासाठी करावयाची उपाययोजना सुचविण्यासाठी विद्यापीठनिहाय खालीलप्रमाणे उपसमिती, तसेच, राज्यस्तरावर शिखर समिती गठीत करुन संकलित मूल्यमापन अहवाल तयार करण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अ) विद्यापीठनिहाय उपसमिती :-**

| | | |
|---|---|---|
| १) | संचालक, विस्तार शिक्षण (संबंधित कृषि विद्यापीठ) | - अध्यक्ष |
| २) | विभागीय कृषि सहसंचालक (विद्यापीठ कार्यक्षेत्रातील सर्व) | - सदस्य |
| ३) | विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग (संबंधित कृषि विद्यापीठ) | - सदस्य सचिव |

**उपसमितीवरील जबाबदारी :-**

कृषि विद्यापीठ क्षेत्रातील जिल्ह्यामध्ये सन २०१६-१७ या वर्षात वाढलेल्या कृषि वृध्दी दरांची कारणमिमांसा आणि मुल्यमापन करुन त्याचा अहवाल राज्यस्तरीय समितीस सादर करणे.

**ब) राज्यस्तरीय शिखर समिती :-**

| | |
|---|---|
| १. मा.डॉ.बी.वेकंटश्वरलू, कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | - अध्यक्ष |
| २. संचालक, विस्तार शिक्षण (सर्व कृषि विद्यापीठे) | - सदस्य |
| ३. संचालक, विस्तार व प्रशिक्षण, कृषि आयुक्तालय | - सदस्य |
| ४. विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | - सदस्य सचिव |

**राज्यस्तरीय शिखर समितीची जबाबदारी :-**

कृषि विद्यापीठाअंतर्गत गठीत उपसमितीच्या अहवालांच्या आधारे महाराष्ट्र राज्याचे सन २०१६-१७ चे कृषि वृध्दी दर वाढीचे मुल्यमापन व भविष्यात कृषि वृध्दीदर वाढीसाठी उपाययोजना सुचविणे.

२. राज्यस्तरीय समितीमध्ये आवश्यकतेनुसार तज्ञ अधिकारी व्यक्तींना कामकाजात सहभागी करुन घेता येईल.

३. वरीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या विद्यापीठनिहाय उपसमितीने त्यांचा अहवाल तीन महिन्याच्या कालावधीत राज्यस्तरीय समितीकडे सादर करणे आवश्यक आहे. तसेच राज्यस्तरीय समितीने त्यापुढील दोन महिन्याच्या कालावधीत त्यांचा अहवाल शासनास सादर करणे आवश्यक आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११५३३२०६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f4ebb91d526d59e93b9365fba816854d2dfa38e53ed59ae4b31ba8260ba52882, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.05.31 15:39:49 +05'30'

**( श. बा. पावसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२) कुलगुरु, विद्यापीठे (सर्व)
३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
६) संचालक (विस्तार शिक्षण), विद्यापीठे (सर्व)
७) सह सचिव (कार्या.११-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
८) विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, विद्यापीठे (सर्व)
९) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) निवडनस्ती, कार्यासन-११अे.